**कायर बंधारा प्रकल्प तालुका वणी, जि.यवतमाळ
मुख्य कालव्या वरील मातीकाम व बांधकामाच्या
विशेष दुरूस्ती कामास प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमा-२०१८/(प्र.क्र.४४२/२०१८)/सिंव्य (कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ डिसेंबर, २०२१

वाचा:- १. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र जा.क्र.१०९३०/विपाविम/कातां-३(१)/२०१८, दिनांक ३.११.२०१८
२. शासन निर्णय, क्रमांक-२०१७/(५६६/१७)/सिंव्य (कामे), दिनांक ३१ ऑगस्ट,२०१८
३. शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२, दिनांक २६ मे,२०१७

**प्रस्तावना:-**

वणी तालुक्यातील कायर गावाजवळ स्थानिक नाल्यावर कायर बंधारा बांधण्यात आलेला आहे. सदर बंधाऱ्याचे बांधकाम सन, १९०१ मध्ये पूर्ण करण्यात आलेले आहे. या बंधाऱ्यास १.३५ कि.मी. लांबीचा डावा तसेच २.७० कि.मी. चा उजवा मुख्य कालवा आहे व बंधाऱ्याची सिंचन क्षमता २२३.०० हेक्टर आहे. या बंधाऱ्यामुळे कायर या वणी तहसिल मधील गावांतील शेतकऱ्यांना सिंचनाचा लाभ होतो. प्रकल्पाच्या बंधाऱ्यांची लांबी ६२.८० मी.असून उंची ५.३५ मी. आहे. प्रकल्पाचे एकूण समादेश क्षेत्र ३५८ हेक्टर, लागवडी योग्य क्षेत्र ३२५ हेक्टर व सिंचन क्षेत्र २२३ असून सिंचन क्षमता २२३ हेक्टर आहे. प्रकल्पीय अहवालानुसार खरीप व रब्बी हंगामात सिंचन करण्याचे प्रस्तावित होते. त्यानुषंगाने सद्य:स्थितीत या प्रकल्पावर सरासरी ९० हेक्टर क्षेत्रास सिंचन करण्यात येत आहे. सदर बंधाऱ्याचे काम पूर्ण होवून जवळपास १२० वर्षे पूर्ण झालेले असून कालवा व वितरण प्रणालीची बहुतांश लांबी काळ्यामाती प्रकारातील आहे. अतिवृष्टीमूळे व बांधकामास बरीच वर्ष झाल्याने कालवा व वितरण प्रणाली मोठ्या प्रमाणात ना दुरूस्त झालेली असुन त्यामुळे कालव्याच्या एकूण लांबीत सिंचन करणे शक्य होत नाही. बंधाऱ्यावर पुर्ण क्षमतेने सिंचन राबविण्यासाठी मुख्य कालव्याचे पुनर्स्थापना करून त्यावरील बांधकामे व विमोचकांचे अत्यावश्यक दुरूस्ती व निवडक ठिकाणी संधानक अस्तरीकरण करणेबाबतच्या कामाची मागणी, स्थानिक लोकप्रतिनिधी, पाणी वापर संस्थेने व लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांनी वेळोवेळी केलेली होती. त्या अनुषंगाने, संदर्भ क्र.२ व ३ येथिल शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून सदर कामाकरीता विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

कायर बंधारा प्रकल्प, तालुका वणी जि. यवतमाळ या प्रकल्पाच्या कालवा मातीकाम व बांधकामाच्या विशेष दुरूस्ती कामास रू.५१,३७,९९९/-, स्वामित्व शुल्क रू.९,३३,९७०/-, ३% अनुषंगिक, १ टक्का वि.मा. व १२% जीएसटी यांचा एकत्रित खर्च रू.८,२२,०८०/-, अशा एकूण रू.६८,९४,०४९/- (रू.अडुसष्ट लक्ष, चौऱ्यान्नव हजार, एकोणपन्नास फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या अधिकारान्वये व आं.वि.स. व उ.स. यांच्या सहमतीने खालील अटीच्या अधिन राहून सोबतच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दिनांक १.१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे, अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन पत्र, दि.४.६.२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे, आर्थिक निकष, मा.राज्यपाल यांच्या निर्देशानुसार निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारित तरतुद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकासह सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

५. पाणी वापर सदस्यांना विश्वासात घेऊनच आवश्यक तरतुद करणे, प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरू करण्यापूर्वी करणे, कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करणे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

६. माती कामे व गवत झाडे/झुडुपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

७. प्रस्तावित कामांमुळे खोदकाम/तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करून बचत साधावी.

८. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा. सदरची कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल महामंडळ स्तरावर जतन करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्व अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

९. विषयांकीत प्रमा अंदाजपत्रकातील तरतुदी, दर, वहनअंतर, संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबादारी क्षेत्रिय अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांची राहील.

१०. सदर प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरीक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

२. प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०, सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (००)(१९) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ७४९९)(विस्तार व सुधारणा)(कार्यक्रम) ५४, गुंतवणुका या लेखाशिर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, क्र.संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दिनांक २६ मे, २०१७ मध्ये विहित केल्यानुसार कामांच्या खर्चाबाबतीत रू.५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय देण्याचे अधिकार आहेत. त्यानुसार आं.वि.स व उ.स. यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवही २०२०-२१ मध्ये अ.क्र.३४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२३१७३७२८५४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2021.12.23 17:38:10 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
शासनाचे उप सचिव

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
९. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मुंबई
१०. प्रधान सचिव(जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मुंबई
११. सचिव(जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मुंबई
१२. सचिव(प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मुंबई
१३. महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई
१४. महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य मुंबई
१५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती
१७. आंतरवित्त सल्लागार तथा सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. अधीक्षक अभियंता, यवतमाळ सिंचन मंडळ, यवतमाळ
१९. सिंव्य(कामे) संग्रहार्थ.

कायर बंधारा प्रकल्प तालुका वणी, जि.यवतमाळ मुख्य कालव्या वरील मातीकाम व बांधकामाच्या विशेष दुरूस्ती कामास प्रशासकीय मान्यता

शासन निर्णय क्र.प्रमाप्र-२०१८/ (प्र.क्र.४४२/२०१८)/सिंव्य (कामे), दिनांक २३ डिसेंबर, २०२१ सोबतचे सहपत्र

**परिशिष्ट-अ**

| **अ.क्र.** | **तपशिल** | **रक्कम रू.लक्ष** |
|---|---|---|
| १. | मुख्य बंधारा दुरूस्ती | १४,४४,७१४ |
| २. | मुख्य कालवा व त्यावरील बांधकामांची दुरूस्ती व पुनर्स्थापना | ३१,७२,१४६ (स्थापत्य भाग)<br>५,२१,१३९ (यांत्रिकी भाग) |
| ३. | एकूण (१+२) | ५१,३७,९९९ |
| ४. | स्वामित्व शुल्क | ९,३३,९७० |
| ५. | १% विमा | ५१,३८० |
| ६. | १२% जी.एस.टी. | ६,१६,५६० |
| ७. | ३% अनुषंगिक खर्च | १,५४,१४० |
| | **एकूण** | **६८,९४,०४९** |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2021.12.23 17:38:50 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
शासनाचे उप सचिव